महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयास सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल, २०१७ व मे, २०१७ या २ महिन्यांकरिता लेखाअनुदान वितरित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः बियुडी २०१७/प्र.क्र.९५/कार्या-४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १७.०४.२०१७

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं २०१७/प्रक्र.६८/अर्थसंकल्प-३, दि.५ एप्रिल, २०१७

२) शासन परिपत्रक, अल्पसंख्याक विकास विभाग अविवि २०१७/प्रक्र.३१/का.४, दि.५ एप्रिल, २०१७

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयास सन २०१७ -१८ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून माहे एप्रिल, २०१७ व मे, २०१७ या २ महिन्यांच्या कालावधीकरिता अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयासाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात रु.७३,७१,०००/- (रुपये त्र्याहत्तर लाख एकाहत्तर हजार मात्र ) इतके योजनेत्तर अनुदान मंजूर आहे. सदर मंजूर अनुदानातून माहे एप्रिल व मे, २०१७ या दोन महिन्यायंसाठी रु. २०,००,०००/- (रुपये वीस लाख मात्र) इतके लेखा अनुदान वितरित करण्यास उपरोक्त संदर्भ क्र.१ व २ येथील शासन परिपत्रकान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. त्यास अनुसरुन महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद या कार्यालयासाठी माहे एप्रिल, २०१७ व मे, २०१७ या दोन महिन्यांच्या कालावधीसाठी रु.२०,००,०००/- (रुपये वीस लाख मात्र) इतके लेखा अनुदान खाली दर्शविलेल्या मासिक निधी विवरणाप्रमाणे पीठासीन अधिकारी, महाराट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. पीठासीन अधिकारी, महाराट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद यांनी खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी.

| “मागणी क्र.झेडई-१, २०५३, जिल्हा प्रशासन, (००)(१०१), आयुक्त (००)(०१) आयुक्त, औरंगाबाद, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, आस्थापना खर्च (२०५३१२५ ८)” | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ.क्र | लेखाशिर्ष तपशीलवार | सन २०१७-१८ साठी अर्थसंकल्पीय अंदाज | माहे एप्रिल व मे साठी वितरणासाठी उपलब्ध अनुदान | वितरीत करावयाचे अनुदान | |
| | | | | एप्रिल,२०१७ | मे,२०१७ |
| १ | ०१ वेतन | ६४,९८,००० | १७,००,००० | ८,५०,००० | ८,५०,००० |
| २ | ०६ दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क | ८४,००० | ४०,००० | २०,००० | २०,००० |
| ३ | ११ देशांतर्गत प्रवास खर्च | ३०,००० | १०,००० | ५,००० | ५,००० |
| ४ | १३ कार्यालयीन खर्च | ६,९९,००० | २,००,००० | १,००,००० | १,००,००० |
| ५ | २४ पेट्रोल तेल व वंगण | ६०,००० | ५०,००० | २५,००० | २५,००० |
| | **एकूण** | **७३,७१,०००** | **२०,००,०००** | **१०,००,०००** | **१०,००,०००** |

उपरोक्त खर्च “मागणी क्र.झेडई-१, २०५३, जिल्हा प्रशासन, (००)(१०१), आयुक्त (००)(०१) आयुक्त, औरंगाबाद, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, आस्थापना खर्च (२०५३१२५ ८) योजनेत्तर” या लेखाशीर्षाखाली खर्च टाकण्यात यावा.

हा शासन निर्णय शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०१७/प्रक्र.६८/अर्थसंकल्प-३, दि.०१ एप्रिल, २०१७ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१७१०५८३३३२१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=39e858554371a26f6672b036224cff0a48a63a836a4067a8da9a8cca6d83429e, cn=Sandesh Chhabu Tadvi
Date: 2017.04.17 15:32:59 +05'30'

(सं. छ. तडवी)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग
२. पीठासीन अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, औरंगाबाद,
३. जिल्हाधिकारी, औरंगाबाद,
४. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
५. महालेखापाल १/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
६. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/नागपूर,
७. उपसचिव (कोषा/प्र.१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. कार्यासन अधिकारी (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. निवडनस्ती/कार्यासन-४ संग्रहार्थ.